**स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) अंतर्गत राज्यात दि २५.सप्टेबर २०१५,ते दि ११ ऑक्टोबर, २०१५ या कालावधीत स्वच्छता जागृती अभियान राबविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः स्वभामि-२०१५/प्र.क्र.१६५/पापु-०८

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
मंत्रालय,मुंबई
**तारीख: २४ सप्टेंबर,२०१५**

वाचा :-

**पेयजल व स्वच्छता मंत्रालय,केंद्र शासन,नवी दिल्ली यांचे दि.१४ सप्टेबर,२०१५ रोजीचे पत्र.**

प्रस्तावना :-

स्वच्छ भारताचे स्वप्न पूर्ण करण्यासाठी मा.पंतप्रधान महोदय यांनी दि .२ ऑक्टोबर,२०१४ पासून स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) ची अंमलबजावणीचे सुतोवाच केले आहे. सदर अभियानाला उदंड प्रतिसाद लाभावा या दृष्टीने समाजातील प्रत्येक घटकाचा सहभाग या अभियानामध्ये आवश्यक आहे. सदर अभियानाच्या अंमलबजावणीस येत्या ऑक्टोबर महिन्यात १ वर्षाचा कालावधी पूर्ण होणार आहे . त्यामुळे जनतेमध्ये स्वच्छतेची जाणीव जागृत ठेवण्यासाठी दि.२५ सप्टेबर,२०१५ ते दि.११ ऑक्टोबर,२०१५ (श्री जयप्रकाश नारायण यांच्या जन्मशताब्दी रोजी) या कालावधीत स्वच्छता अभियान राबविण्याचे केंद्र शासनाच्या संदर्भाधीन पत्रान्वये सूचना देण्यात आल्या आहेत. त्या अनुषंगाने स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) अंतर्गत स्वच्छता जागृती अभियान राबविसाठी पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

## शासन परिपत्रक :-

स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) अंतर्गत राज्यात दि.२५ सप्टेबर २०१५ ते दि. ११ ऑक्टोबर,२०१५ या कालावधीत स्वच्छता जागृती अभियान राबविण्यात यावा. यासाठी राज्यस्तर,जिल्हास्तर व व ग्रामपंचायत स्तरावर विविध जनजागृतीचे कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

**अ) राज्यस्तरीवरील करावयाची कार्यवाही:-**

१. राज्यस्तरावरील स्वच्छता जागृती अभियनाचा कृती आराखडा पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी तयार करून त्याची दि.२५ सप्टेबर २०१५ ते दि. ११ ऑक्टोबर,२०१५ या कालावधीत अंमलबजावणी करावी.

२. सदर कृती आराखडा तयार करतांना जन जागृतीसाठी अशी प्रसार माध्यमे निवडावीत ज्यामुळे एकाच वेळी कमीत कमी वेळात जास्तीत जास्त जनतेपर्यंत स्वच्छतेचा संदेश पोहचविणे शक्य होईल.
३. वैयक्तिक स्वच्छता,घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन,सार्वजनिक स्वच्छता, सुरक्षित आरोग्याच्या दृष्टीने पिण्याच्या पाण्याची साठवण, स्वस्थ आरोग्याच्या दृष्टीने स्वच्छतेचे असलेले महत्व लहान बालकांना पटविण्यासाठी करावयाचे उपक्रम,इत्यादी या बाबींचा समावेश कृती आराखड्यात असावा.

**ब) जिल्हास्तरावर करावयाची कार्यवाही/कार्यक्रमः-**

१. दि.२५/०९/२०१५ रोजी स्वच्छता जागृती अभियानाचे उद्धाटन जिल्हा परिषद कार्यालयात करण्यात यावे. यावेळी लोकप्रतिनिधी,स्वच्छतेच्या क्षेत्रात कार्यरत असलेल्या सेवाभावी संस्था इत्यादी मान्यवरांना आमंत्रित करण्यात यावे.
२. स्थानिक वृत्तपत्र,केबल नेटवर्क,या माध्यमातून स्वच्छतेविषयी संदेश घराघरात पोहचविण्यात यावेत.
३. बस थांबा,आठवडी बाजार अशा सार्वजनिक ठिकाणी पथनाट्य सादर करण्यात यावे.
४. स्वच्छतेच्या अनुषंगाने शाळांमध्ये वक्तृत्व स्पर्धांचे आयोजन करण्यात यावे. विद्यार्थ्यांना प्रोत्साहन स्वरुप पारितोषिक देण्यात यावेत.
५. स्वच्छतेचे संदेश असणारे फलक सावर्जनिक ठिकाणी लावण्यात यावेत.
६. जिल्हा स्तरावरील ग्रामीण भागांतील शासकीय कार्यालयामध्ये व परिसरात स्वच्छतेची मोहिम राबविण्यात यावी.

**क) ग्रामपंचायत स्तरावर करावयाची कार्यवाही/कार्यक्रमः-**

१. दि.२५/०९/२०१५ रोजी स्वच्छता जागृती अभियाने उद्धाटन करून गांधीजयंती रोजी ग्रामसभा घेण्यात यावी. ग्रामसभेमध्ये स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) अंतर्गत असलेल्या अनुदानाबद्दल माहिती लोकांना द्यावी. तसेच ग्रामस्थांना स्वच्छता अभियानात सहभागी होण्यासाठी प्रवृत्त करावे.ग्रामसभेमध्ये स्थानिक लोकप्रतिनिधी,वक्ते यांना आमंत्रित करण्यात यावे.
२. स्वच्छता अभियानाच्या प्रचारासाठी गावामध्ये लहान मुलांची शोभा यात्रा काढण्यात यावी.
३. जत्रा,आठवडी बाजार अशा सार्वजनिक ठिकाणी पथनाट्य स्थानिक कलांकरांना घेऊन सादर करण्यात यावे.

४. स्वच्छता जागृती अभियानाच्या कालावधीत गावातील परिसर प्रत्यक्ष सफाई करुन घ्यावा. शक्यतो यामध्ये स्वयंसेवक, मुले यांचा समावेश करण्यचा प्रयत्न करावा.
५. हगणदारीमुक्तीसाठी प्रयत्न करणे.

उपरोक्त सूचना या मार्गदर्शक स्वरुपाच्या असून त्यांचा उद्देश स्वच्छतेविषयी लोकांमध्ये जाणीव जागृती निर्माण करून त्यांच्यामध्ये स्वच्छतेची आवड निर्माण करणे व ती कायम टिकणे असा आहे. त्यामुळे जिल्हास्तरावरील व ग्रामपंचायत स्तरावरील तेथील स्थानिक परिस्थिती व उपलब्ध साधने यांचा वापर करावा. यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांनी योग्य तो निर्णय घ्यावा.

स्वच्छता जागृती अभियानासाठी करण्यात येणा-या बाबींसाठी स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) अंतर्गत असलेल्या माहिती शिक्षण व संवाद या घटकांतर्गत खर्च करण्यात यावा. सदरचा खर्च हा स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) मधील माहिती शिक्षण व संवाद यासाठी असलेल्या प्रमाणाच्या मर्यादेतच राहील याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२४१३३०२६८४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Sudhakar Dange

Digitally signed by Hemant Sudhakar Dange
DN: CN = Hemant Sudhakar Dange, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.09.24 15:38:09 +05'30'

**(हेमंत सु.डांगे)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव,राजभवन,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे सचिव,मंत्रीलय,मुंबई.
३. मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता,याचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
४. मा.मंत्री, सर्व यांचे खाजगी सचिव,मंत्रीलय मुंबई.
५. मा.राज्यमंत्री,सर्व,मंत्रालय,मुंबई.
६. मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य,सर्व विधानभवन/विधानपरिषद,मुंबई
७. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,मंत्रीलय मुंबई.
८. मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सर्व,यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई

९. विभागीय आयुक्त,महसूल विभाग कार्यालय,सर्व.
१०.उप सचिव,पापु-०८,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय मुंबई.
११.जिल्हाधिकारी कार्यालय,सर्व
१२.मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,सर्व
१३.संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,बेलापूर,नवी मुंबई.
१४.उप मुख्य कार्यकारी अधिकारी,पाणी व स्वच्छता,जिल्हा परिषद,सर्व.
१५.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने,सर्व,मंत्रालय,मुंबई.
१६.निवड नस्ती,कार्यासन पापु-०८